**व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील अनुसूचित जाती व नवबौध्दांच्या मुलामुलींकरीता विभागीय स्तरावर सुरू करण्यात आलेल्या उच्चस्तर औदयोगिक प्रशिक्षण संस्थामधील योजनांतर्गत १२८ अस्थायी पदांना दिनांक ०१/०९/२०२१ ते दिनांक २८/०२/२०२२ पर्यंत मुदतवाढ देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आयटीआय-२०१९/प्र.क्र. ४५/व्यशि-३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २७ ऑक्टोबर, २०२१.

वाचा:- १) सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. इबीसी-२००४/प्र.क्र.५/मावक-२ दि. ०९.०१.२००६
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क., दि. १०.०८.२०२१
३) संचालक (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, मुंबई यांचे पत्र क्र. व्यशिप्र-२०२१/आस्था-३/मुदतवाढ/०६५, दि. २४.०८.२०२१

**प्रस्तावना :-**

व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील अनुसूचित जाती व नवबौध्दांच्या मुलामुलींकरीता विभागीय स्तरावर सुरू करण्यात आलेल्या उच्चस्तर औदयोगिक प्रशिक्षण संस्थामधील योजनांतर्गत १२८ अस्थायी पदांना संदर्भीय (१) येथील शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आलेली आहे. सदर अस्थायी पदांना दिनांक ३१.०८.२०२१ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. वित्त विभागाच्या संदर्भाधिन (२) येथील शासन निर्णयान्वये दिनांक ०१/०९/२०२१ ते दिनांक २८/०२/२०२२ पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान केले आहेत. त्यास अनुलक्षून संचालक (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी संदर्भीय (३) येथील पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावानुसार अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील अनुसूचित जाती व नवबौध्दांच्या मुलामुलींकरीता विभागीय स्तरावर सुरू करण्यात आलेल्या उच्चस्तर औदयोगिक प्रशिक्षण संस्थामधील योजनांतर्गत १२८ अस्थायी पदांना (सोबत जोडलेल्या प्रपत्र अ येथील) दिनांक ०१.०९.२०२१ पासून दिनांक २८.०२.२०२२ पर्यंत चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये पुढील अटी व शर्तीस अधिन राहून मंजूरी देण्यांत येत आहे.

**अटी व शर्ती :-**

उपरोक्त पदे ज्या प्रयोजनासाठी निर्माण करण्यांत आली, त्याच प्रयोजनासाठी पुढे चालू ठेवण्यात यावीत. चालू ठेवण्यात आलेल्या अस्थायी पदांवरील कर्मचारी नियमानुसार मिळणारे वेतन भत्ते इत्यादी मिळण्यास पात्र समजण्यात यावेत.

१) मुदतवाढ दिलेल्या पदांपैकी कोणतेही पद ६ महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त नाही याची खात्री करून घेण्यात यावी.

२) सदर कालावधीमध्ये मंजूर पदांच्या आढाव्यास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेतलेली आहे. तथापि, त्यानंतर पदनिर्मिती मंजूर झालेली आहे. अशा प्रकरणी नवनिर्मिती पदांच्या समवेक्षनासह पदांच्या आकृतीबंधास मान्यता घेण्याची कार्यवाही विहित कालावधीत पूर्ण करावी.

३) सदर अस्थायी पदांच्या वेतनाचा प्रश्न उद्भवल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांची राहील. या कालावधीनंतर आकृतीबंध निश्चित करण्यासाठी कालावधी वाढवून देण्यात येणार नसल्याची कृपया नोंद घ्यावी.

२. या प्रस्तावावर होणारा खर्च सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षात खालील लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

" मागणी क्र. एन-३, मुख्य लेखाशीर्ष २२२५ अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण, ०१- अनुसूचित जातीचे कल्याण, २७७-शिक्षण, (०१)(०४) अनुसूचित जाती व नवबौध्द मुला-मुलींकरिता विभागीय स्तरावर औद्योगिक प्रशिक्षण संस्था सुरू करणे (विघयो) (२२२५ ४१०४) "

उपरोक्त लेखाशिर्षाखालील अर्थसंकल्पीय अंदाज, सुधारित अंदाज तसेच अंतिम सुधारित अनुदानाचे प्रस्ताव विहित वेळेत सादर करण्याची दक्षता संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांनी घ्यावी.

३. सदर शासन निर्णय सामाजिक न्याय विभाग यांच्या सहमतीने तसेच वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/ आ.पु.क., दिनांक १०.०८.२०२१ अन्वये प्रशासकीय विभागाला प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यांत येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११०२७११५००१९७०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vinod S Bondre

Digitally signed by Vinod S Bondre
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=eOffice, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a12c7f1f38ac4843c1097ae135afa734591db9c7fc1f0b1e67c1629a13aa401e, serialNumber=c313a8b86d67716d182c41d1e22f57d99c8ee5f4654a216d8fe23b5ad24ed271, cn=Vinod S Bondre
Date: 2021.10.27 11:52:28 +05'30'

**( विनोद बोंदरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. सर्व संबंधित सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय (संचालनालयामार्फत).
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
४. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखाधिकारी, मुंबई.
७. सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी. (संचालनालयामार्फत).
८. अवर सचिव/कक्ष अधिकारी (व्यशि-१)/(व्यशि-२)/(व्यशि-५/रोस्वरो-२), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अवर सचिव (व्यय-५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०. अवर सचिव (का.१४७१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
११. कार्यासन अधिकारी (शिक्षण १), सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. निवड नस्ती (व्यशि-३), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई.

| प्रपत्र अ<br>अनुसूचित जाती व नवबौद्धांच्या मुलामुलींकरिता सुरु करण्यात आलेल्या उच्चस्तर औद्योगिक प्रशिक्षण संस्थांकरिता मंजूर योजनांतर्गत अस्थायी पदांना चालू ठेवण्यास मंजूरी देण्यात आलेल्या १२८ अस्थायी पदांचा तपशिल | | | | |
|---|---|---|---|---|
| अ. क्र. | पदनाम | ६ व्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी | | मुदतवाढ देण्यात आलेली पदे |
| | | वेतन बँड | ग्रेड वेतन | |
| | **गट-अ (क)** | - | - | - |
| १ | प्राचार्य | १५६००-३९१०० | ५४०० | ४ |
| | **एकूण (वर्ग-१ (क))** | | | **४** |
| | **गट-क** | - | - | - |
| २ | गट निदेशक | ९३००-३४८००<br>--"-- | ४४००<br>४६००-व.श्रेणी | ८ |
| ३ | शिल्प निदेशक | ९३००-३४८००<br>--"--<br>--"-- | ४३००<br>४४००-वरिष्ठ श्रेणी<br>४८००-निवड श्रेणी | ४८ |
| ४ | गणित निदेशक | ९३००-३४८००<br>--"--<br>--"-- | ४३००<br>४४००-वरिष्ठ श्रेणी<br>४८००-निवड श्रेणी | ४ |
| ५ | चित्रकला निदेशक | ९३००-३४८००<br>--"--<br>--"-- | ४३००<br>४४००-वरिष्ठ श्रेणी<br>४८००-निवड श्रेणी | ४ |
| ६ | मुख्य लिपिक/प्रमुख लिपिक | ९३००-३४८०० | ४२०० | ४ |
| ७ | वरिष्ठ लिपिक/लेखापाल | ५२००-२०२०० | २४०० | १२ |
| ८ | भांडारपाल | ५२००-२०२०० | २४०० | ४ |
| ९ | कनिष्ठ लिपिक/कनिष्ठ लिपिक-टंकलेखक/लिपिक-टंकलेखक | ५२००-२०२०० | १९०० | ८ |
| | **एकूण (गट-क)** | | | **९२** |
| | **कंत्राटी पद्धती** | - | - | - |
| १० | चतुर्थश्रेणी कर्मचारी | रु.२५००/- दरमहा | -- | ८ |
| ११ | कर्मशाळा परिचर | रु.२५००/- दरमहा | -- | ४ |
| १२ | भांडार परिचर | रु.२५००/- दरमहा | -- | ४ |
| १३ | चौकीदार | रु.२५००/- दरमहा | -- | १२ |
| १४ | सफाईगार | रु.२५००/- दरमहा | -- | ४ |
| | **एकूण (कंत्राटी पद्धती)** | | | **३२** |
| | **एकूण** | | | **१२८** |